**ध्वनी प्रदुषणाबाबत पोलीस यंत्रणेकडून करावयाच्या कार्यवाहीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : डिआयएस ०९१०/प्र.क्र.४३४/वि.शा.१ ब**
दुसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १४ जुलै, २०१५

वाचा :- मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० मध्ये दिनांक १३.०३.२०१५ व दिनांक २४.०६.२०१५ रोजी दिलेले आदेश.

**प्रस्तावना :-**

जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० (डॉ.महेश बेडेकर विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर) या याचिकमेमध्ये मा.उच्च न्यायालयाने ध्वनी प्रदुषणाबाबतच्या नियंत्रणाबाबत निर्देश दिले आहेत. त्यानुसार खालील परिपत्रक निर्गमित करण्यात येत आहे.

**परिपत्रक :-**

जनहित याचिका क्रमांक १७३/२०१० (डॉ.महेश बेडेकर विरुद्ध महाराष्ट्र शासन व इतर) या याचिकेमध्ये मा.उच्च न्यायालयाने "Noise Pollution (Regulation and Control) Rules, २०००" व महाराष्ट्र पोलीस अधिनियम, १९५१ च्या तरतुदींची अंमलबजावणी करण्याचे निर्देश संदर्भाधिन आदेशान्वये दिलेले आहेत. त्याअनुषंगाने सर्व पोलीस आयुक्त आणि पोलीस अधिक्षक यांनी यासंबंधी खालीलप्रमाणे उपाययोजना कराव्यात :-

१) ध्वनी प्रदुषणाचे उल्लंघनाबाबत सामान्य नागरिकांच्या तक्रारी १०० क्रमांकावर नोंदवून घ्याव्यात. निनावी तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची नोंद घेऊन त्यावर कार्यवाही करण्यात यावी.

२) प्राप्त होणाऱ्या तक्रारींची नोंद घेण्यासाठी एक नोंदवही ठेऊन त्यामध्ये तक्रारींची व त्यावर करण्यात आलेल्या कार्यवाहीची नोंद घेण्यात यावी.

३) ध्वनी प्रदुषणाबाबत तक्रार करण्यासाठी ई-मेल ची सुविधा उपलब्ध करुन द्यावी.

४) उपरोक्त सुविधांची स्थानिक वृत्तपत्रे, स्थानिक केबल नेटवर्क तसेच इतर प्रसार माध्यमांद्वारे प्रसिद्धी देण्यात यावी.

५) केलेल्या कार्यवाहीचा अहवाल जिल्हादंडाधिकारी व महानगरपालिका आयुक्त यांना त्यांच्या संकेतस्थळावर प्रसिद्धीसाठी सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५०७१४१५४६५०१३२९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jaikumar Sovitkar

Digitally signed by Sunil Jaikumar Sovitkar
DN: CN = Sunil Jaikumar Sovitkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2015.07.14 19:18:35 +05'30'

**( सु.ज.सोवितकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे सचिव.
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा.
६. सर्व विधान परिषद / विधानसभा सदस्य.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन विभाग.
९. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, मुंबई. (पत्राने)

१०. सर्व विभागीय आयुक्त.

११. सर्व महानगरपालिका आयुक्त.

१२. सर्व जिल्हादंडाधिकारी.

१३. सर्व पोलीस आयुक्त.

१४. सर्व पोलीस अधिक्षक.

१५. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.

१६. सर्व नगरपालिका / नगर परिषद मुख्याधिकारी.

१७. निवडनस्ती (वि.शा.१ ब)